**साहित्य क्षेत्रात भरीव कामगिरी करणाऱ्या नामवंत साहित्यिकास विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार व साहित्य निर्मितीक्षेत्रात मोलाचे कार्य करणाऱ्या उत्कृष्ट प्रकाशन संस्थेस श्री.पु.भागवत पुरस्कार प्रदान करण्यासाठी निवड समितीची पुनर्रचना व शासन निर्णय सुधारित करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुरस-२०२०/प्र.क्र.६६/भाषा-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक: १६ ऑक्टोबर, २०२०.**

**वाचा :-**

१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.विंदापु-१०१२/प्र.क्र.८४/२०१२/भाषा-३, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१२.

२) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.रावापु-१०१२/प्र.क्र.१०३/२०१२/भाषा-३, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१२.

३) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.विंदापु-१०१४/प्र.क्र.११२/२०१४/भाषा-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५.

४) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.श्रीपुभा-१०१४/प्र.क्र.११३/२०१४/भाषा-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५.

५) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे क्र. सासंमं २०२०/११२७, दि.१९.८.२०२० रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

मराठी साहित्य / वाङ्मय क्षेत्रात भरीव कामगिरी करणाऱ्या नामवंत साहित्यिकास विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार तसेच साहित्य निर्मिती क्षेत्रात मोलाचे कार्य करणाऱ्या उत्कृष्ट प्रकाशन संस्थेस श्री.पु.भागवत पुरस्कार प्रदान करण्याचा निर्णय शासनाकडून घेण्यात आला आहे. विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्काराचे स्वरूप रूपये ५,००,०००/- (रूपये पाच लक्ष मात्र) रोख, मानचिन्ह व मानपत्र तसेच श्री.पु.भागवत पुरस्काराचे स्वरूप रूपये ३,००,०००/- (रूपये तीन लक्ष मात्र) रोख, मानचिन्ह व मानपत्र असे आहे.

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाकडून राबविण्यात येणारी ही योजना सन २०१२-१३ पासून मराठी भाषा विभागाकडे वर्ग करण्यात आली असल्यामुळे, संदर्भ क्र.३ व ४ च्या शासन निर्णयान्वये निवड समितीची पुनर्रचना करण्यात आली असून, पुरस्कार निवडीसाठी निकष निश्चित करण्यात आले आहेत. दिनांक २८.११.२०१९ पासून महाराष्ट्र राज्यामध्ये नवीन मंत्रीमंडळ अस्तित्वात आले असल्यामुळे विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्कार व श्री.पु.भागवत पुरस्कार निवड समितीची पुनर्रचना करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तसेच संदर्भाधीन दि.१९.८.२०२० नुसार प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार शासन निर्णय दि.३१.०८.२०१२ मधील परि.४ व शासन निर्णय दि.१२.२.२०१५ मधील परि.२ मध्ये सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठी साहित्य क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या व भरीव योगदान देणाऱ्या ज्येष्ठ साहित्यिकांस “विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार” तसेच साहित्य निर्मिती क्षेत्रात मोलाचे कार्य करणाऱ्या उत्कृष्ट प्रकाशन संस्थेस “श्री.पु.भागवत पुरस्कार” प्रदान करण्याकरीता मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे निवड समितीची पुनर्रचना करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. मा.मुख्यमंत्री | - | अध्यक्ष |
| २. मा.मंत्री (मराठी भाषा) | - | सदस्य |
| ३. मा.राज्यमंत्री (मराठी भाषा) | - | सदस्य |
| ४. सचिव, मराठी भाषा विभाग | - | सदस्य |
| ५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ | - | सदस्य |
| ६. अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ | - | सदस्य |
| ७. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ | - | सदस्य सचिव |

२. संदर्भाधीन शासन निर्णय दि.३१.०८.२०१२ मधील परि.४ व शासन निर्णय दि.१२.२.२०१५ मधील परि.२ (संदर्भ क्र. १ ते ४) येथे खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

“सदर समितीचे सदस्य सचिव हे अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाच्या चार घटक संस्थांकडून (मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे व विदर्भ साहित्य संघ, नागपूर) तसेच कोकण मराठी साहित्य परिषद, रत्नागिरी व दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभा, कोल्हापूर या संस्थांकडून पुरस्कारासाठी शिफारशी मागवतील. सदर पुरस्कारासाठी प्राप्त झालेल्या शिफारशी तसेच अन्य संस्था (भाषा संचालनालय, राज्य मराठी विकास संस्था, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ) यांच्याकडून प्राप्त झालेल्या शिफारशी समितीपुढे विचारार्थ ठेवतील व सदर समिती पात्र साहित्यिकांची त्यामधून निवड करील.”

३. विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार प्रदान करण्यासाठी साहित्य / वाङ्.मय क्षेत्रात कामगिरी करणाऱ्या नामवंत साहित्यिकांची तसेच श्री.पु.भागवत पुरस्कार प्रदान करण्यासाठी साहित्य निर्मिती क्षेत्रात मोलाचे कार्य करणाऱ्या उत्कृष्ट प्रकाशन संस्थेची निवड करण्यासाठीचे निकषांमध्ये कोणतेही बदल करण्यात आलेले नसून ते संदर्भाधीन क्र.१ ते ४ येथील शासन निर्णयानुसारच राहतील.

४. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांक.झेडएफ-०२, २२०५, कला व संस्कृती (०१) योजनेतर योजना (०१) (०३) - उत्तम पुस्तकांना उत्तेजन - ५० इतर खर्च (२२०५ ३१९९) या लेखाशीर्षाखाली त्या त्या वर्षी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. प्रस्तूत प्रकरणी होणाऱ्या खर्चासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीत देयकावर स्वाक्षरी करण्यासही या आदेशाव्दारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१६१४३३३७११३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJAY DHONDBARAO BHOSALE

Digitally signed by AJAY DHONDBARAO BHOSALE
DN: CN = AJAY DHONDBARAO BHOSALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = NA
Date: 2020.10.16 15:21:41 +05'30'

**(अ.धों.भोसले)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
३) मा.राज्यमंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
५) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
८) सचिव (मराठी भाषा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९) अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, मराठवाडा साहित्य परिषद, सन्मित्र कॉलनी, औरंगाबाद- ४३१ ००१.
१०) अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
११) अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
१२) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
१३) संचालक, भाषा संचालनालय, मुंबई,
१४) निवड नस्ती / भाषा-३.